**सामाजिक न्याय विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व निवासी शाळातील विद्यार्थ्यांना वस्तू स्वरूपात लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात थेट जमा करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२२/प्र.क्र.४० /शिक्षण-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १८ जुलै, २०२४

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-१०८२/९०३८५/(३८)/बीसीडब्ल्यु-४ दि.१६ मे १९८४.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-२००२/प्र.क्र. २६८/मावक-४, दि. ४ जुलै, २००३.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-२०१०/प्र.क्र. ४३०/मावक-४, दि. २६ जुलै, २०११.
४. शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्रमांक:- भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१ डिसेंबर, २०१६.
५. शासन निर्णय,नियोजन विभाग,क्रमांक:-डिसीटी२३१६/प्र.क्र.१३३/का.१४१७,दि.५डिसेंबर,२०१६.
६. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शानिशा/तरतूद मागणी/शिक्षण/ /का-५अ/२३-२४/५८,दि.४.१.२०२४

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय विभागामार्फत राज्यात मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळातील सुरू आहेत. सदर शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळांमधील प्रवेशित विद्यार्थ्यांना भोजन व इतर आवश्यक सोयीसुविधा सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयान्वये अनुज्ञेय करण्यात आलेल्या आहेत. शासनाव्दारे थेट लाभ हस्तांतरण (DBT) प्रक्रीयेवर मोठया प्रमाणावर भर देण्यात येत असून त्यानुषंगाने नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील दिनांक ५ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विविध कल्याणकारी योजनेंतर्गत वस्तू स्वरूपात देण्यात येणाऱ्या लाभाऐवजी त्याकरीता रोख स्वरूपात थेट रक्कम लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार शासनाकडून देण्यात येणारे कोणतेही अर्थसहाय्य,वित्तीय लाभ व सेवांच्या प्रयोजनार्थ सबंधित लाभार्थ्यांचे अधिप्रमाणन करून किंवा,पुरावा म्हणून आधार क्रमांक प्राप्त करून त्याआधारे लाभार्थ्याच्या आधार संलग्न बँक खात्यात थेट लाभाची रक्कम जमा करणे आवश्यक आहे.

उपरोक्त तरतुदीस अनुसरून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळातील विद्यार्थ्यांना त्यांच्या आवडीनुसार साहित्य खरेदी करण्यास मुभा मिळावी व खरेदीमध्ये पारदर्शकता राहण्याच्या दृष्टीने आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ६ येथील दिनांक ४.१.२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षासाठी शासकीय निवासी शाळांतील विद्यार्थ्यांना वस्तू स्वरूपात मिळणाऱ्या लाभाचे हस्तांतरण रोख स्वरूपात (DBT) लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय वसतीगृहे व शासकीय निवासी शाळांतील विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सोयीसुविधांबाबत तक्ता-अ मध्ये नमूद विविध वैयक्तिक लाभाकरीता निश्चित केलेली रक्कम सबंधित विद्यार्थ्यांच्या आधार क्रमांक संलग्न असलेल्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळातील विद्यार्थ्यांना रोख स्वरूपात थेट लाभ द्यावयाच्या वस्तू इत्यादीचा तपशील व लाभाचे हस्तांतरण पध्दत याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे नमूद केलेला आहे :-

| **अ.क्र.** | **रोख स्वरूपात थेट लाभ द्यावयाच्या वस्तू** | **लाभ हस्तांतरण पध्दत** |
|---|---|---|
| १ | पादत्राणे (Shoes) | सदरच्या वस्तू परिशिष्ट अ-मध्ये नमूद एकुण विद्यार्थी संख्या, परिमाण (Specifications), व तपशीलानुसार विद्यार्थ्याने स्वत: खरेदी करून उपलब्ध करून घेण्यासाठी वसतिगृह व निवासी शाळेत प्रवेशित विद्यार्थ्यास एकत्रित देय रक्कम त्याच्या आधार संलग्न बँक खात्यात थेट जमा करण्यात यावी. |
| २ | शालेय गणवेश (School Uniform) | |
| ३ | पी.टी.गणवेश (P.T.Uniform) | |

**तक्ता-अ**

| **वस्तूंचे नाव** | **अंतिम मागणी** | **आकारमान** | **आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांचेकडून प्राप्त किंमत (प्रती नग) (जीएसटीसह)** | **एकूण रक्कम** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| पादत्राणे (Shoes) | १८६०० | डर्बी/बेली शुज फोम लेदर अप्पर विथ पीव्हीसी सोल | रू.२८५.०० | रू.५३,०१,०००/- |
| शालेय युनिफॉर्म | ३७२०० (प्रति विद्यार्थी दोन याप्रमाणे) | रुंदी-१४२ सेमी, वार्प-१६०DN Micra, वेप्ट- २/३० poly, रिड- १०४ EPI, पिक्स- ५२ PPI | रू.९२६.०० | रू.३,४४,४७,२००/- |
| पी.टी युनिफॉर्म | १८६०० | - | रू.९४५.०० | रू.१,७५,७७,०००/- |
| **(अक्षरी रूपये पाच कोटी त्र्याहत्तर लक्ष पंचवीस हजार दोनशे फक्त) एकूण रूपये** | | | | **रू.५,७३,२५,२००/-** |

३. **उपरोक्त वस्तूऐवजी विद्यार्थ्यास रोख स्वरूपात थेट लाभ देताना अनुसरावयाची कार्यपध्दती :-**

३.१ सामाजिक न्याय विभागांतर्गत मुलामुलींच्या शासकीय वसतीगृहामध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांनी उपलब्ध करून घ्यावयाची पादत्राणे,शालेय गणवेश,पी.टी.गणवेश,रेनकोट इत्यादी साहित्यासाठी रोख रक्कम याची माहिती तक्ता-अ मध्ये नमूद केलेली आहे. त्यानुसार आवश्यक सुविधा उपलब्ध करून घेण्यासाठी देय रक्कम विद्यार्थ्यांच्या आधार क्रमांक संलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

३.२ वसतिगृह /निवासी शाळेत प्रवेशित विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या वस्तूसाठी रोख स्वरूपात थेट रक्कम मिळणार आहे त्या वस्तूचे परिमाण व संख्या इ.तपशीलाची यादी सबंधित गृहप्रमुख/गृहपाल,निवासी शाळेतील मुख्याध्यापक/ अधिक्षक यांनी विद्यार्थी/पालकांना उपलब्ध करून देण्यात यावी.तसेच,वसतिगृहात प्रवेशित सर्व विद्यार्थ्याचे बँक खाते उघडून त्यास आधार क्रमांक संलग्न करण्यात यावा. अशा आधार क्रमांक संलग्न असलेल्या बँक खात्यामध्येच उपरोक्त निश्चित केल्यानुसार देय रक्कम थेट जमा करण्यात यावी.सदर जमा करण्यात आलेल्या रोख रकमेतून विद्यार्थ्यांनी विहीत परिमाण व तपशीलाप्रमाणे वस्तूंची खरेदी केल्याबाबतची खातरजमा सबंधित वसतिगृहाचे गृहप्रमुख/गृहपाल,निवासी शाळेतील मुख्याध्यापक/अधिक्षक यांचेमार्फत करण्यात यावी.

३.३ विभागांतर्गत शासकीय वसतिगृह व शासकीय निवासी शाळेत प्रवेशित विद्यार्थी उपस्थित झाल्यानंतर पहिला हप्त्यामध्ये विद्यार्थ्यांना देय असलेल्या रकमेच्या एकूण ६० टक्के रक्कम त्याच्या आधार क्रमांक संलग्न बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी. तक्ता-अ मध्ये नमूद करण्यात आलेले परिमाण व किंमत ही कमाल आकारमानाचे परिमाण विचारात घेवून नमूद करण्यात आलेली आहे. विद्यार्थ्याने खरेदी केलेल्या सर्व वस्तूंची व सादर केलेल्या पावतीची खातरजमा झाल्यावर लाभार्थ्यांच्या बँक खात्यावर पावतीच्या रकमेएवढी रक्कम किंवा कमाल रकमेच्या मर्यादेच्या अधीन राहून कमी असेल इतकी रक्कम विचारात घेवून एकूण रकमेचे समायोजन करूनच एकत्रित देय रक्कमेच्या उर्वरीत ४० टक्के रक्कम दुसऱ्या हप्त्यात विद्यार्थ्याच्या बँक खात्यात जमा करण्यात यावी.

४. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे आधार क्रमांक संलग्न बँक खात्यावर लाभ देण्याबाबतची कार्यवाही करताना विद्यार्थ्यांचा आधार क्रमांक,बँक खाते क्रमांक व त्याच्याशी सबंधित कोणतीही वैयक्तिक स्वरूपाची माहिती जाहिरपणे प्रकाशित करू नये,किंवा अशी माहिती ऑनलाईन प्रणालीव्दारे सहजरित्या उपलब्ध होणार नाही,याची खबरदारी घेण्यात यावी. लाभार्थ्यांना लाभ देण्यापुरताच अशा माहितीचा वापर करण्यात यावा,आणि याविषयी केंद्रीय आधार कायदा, २०१६ तसेच माहिती तंत्रज्ञान कायदा, २००० व त्याखालील नियम, २०११ मधील तरतुदीचे पालन करून कार्यवाही करण्यात यावी.

५. उपरोक्त प्रमाणे विहीत वेळेत कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सर्व सहायक आयुक्त,समाज कल्याण यांनी प्रादेशिक आयुक्त,समाज कल्याण यांचेमार्फत आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांना सादर करावा. आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांनी याबाबत विहीत कार्यपध्दतीनुसार सर्व विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे/शासकीय निवासी शाळातील विद्यार्थ्यांना वस्तू स्वरूपात अनुज्ञेय केलेल्या वस्तू स्वरूपात मिळणाऱ्या लाभाचे हस्तांतरण रोख स्वरूपात लाभार्थ्याच्या आधार खाते संलग्न बँक खात्यात थेट जमा करण्यात आली असल्याबाबतचा एकत्रित अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

६. याकरीता आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. याबाबत होणारा खर्च हा मागणी क्र. "एन-३ मुख्य लेखाशीर्ष २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, २७७, शिक्षण (०१) वसतिगृहे (१०) शासकीय निवासी शाळा - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१०) (०१) अनुसूचित जातीच्या मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय निवासी शाळा सुरू करणे (अ.जा.उ.यो.) कार्यक्रम, (२२२५-D११७) ५०-इतर खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून त्याखाली मंजूर केलेल्या सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. सदर आदेश,नियोजन विभागाच्या शासन निर्णय,क्रमांक डिसीटी २३१६/ प्र.क्र.१३३/का.१४१७,दिनांक ५ डिसेंबर,२०१६ अन्वये विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७१८१२४२४६९९२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA VIJAYSINH DESHMUKH

Digitally signed by PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a2dd85b17cd3d5311cdc96ff87ec7bb1ccc64c56294fd60222073f2bd8dec000, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3D331EE44AE91C7D48D9B9DBBF7B7A7264F269283FAC405332FED75CFA968E89, cn=PRADNYA VIJAYSINH DESHMUKH
Date: 2024.07.18 12:54:05 +05'30'

**( प्र. वि. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
४.आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे,
५.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
६.सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण,
७.सर्व सहायक आयुक्त,समाज कल्याण,
८.जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे,
९.कार्यासन अधिकारी,वित्त विभाग, व्यय-१४, मंत्रालय, मुंबई-३२,
१०.सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
११.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती (शिक्षण-२).